**राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य (Support to State Extension Reforms) या केंद्र पुरस्कृत योजनेच्याअंमलबजावणीस <u>सन २०१०-११ करिता अनुदान मंजूर करणेबाबत....</u>**

**महाराष्ट्र शासन**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : कृषिका१७१०/प्र.क्र. ३०४/३-अे,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : ३१ मार्च, २०११**

**संदर्भ** :- शासन निर्णय,कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

१)राविका-१७०५/प्र.क्र.३८/३ अे, दिनांक २४ ऑक्टोबर,२००५
२)केंद्र शासनाचे पत्र क्रमांक - मि.सं/एफ नं९-४/२००८ एई,दि.१६ एप्रिल,२०१० चे पत्र
३)केंद्र शासनाचे पत्र क्रमांक - मि.सं/एफ नं २७-१८/२०१०एई, एक्सटेंशन डेक्स,दि.१४ जून,२०१० चे पत्र
४)केंद्र शासनाचे पत्र क्रमांक - मि.सं/एफ न ३६-२८/२००९/एई,एक्सटेंशन.डेक्स,दि.२१ जुलै,२०१० चे पत्र
५)शासन निर्णय क्रमांक कृषिका १७१०/प्र.क्र.१२३/३ ए,दिनांक २४ ऑगस्ट,२०१०
६)कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र.कृआ-एक्स्टे.रिफॉर्मस /विप्र ५/१०टक्के निधी/८०९/२०१०, दि.२५ ऑक्टोबर,२०१०
७)शासन निर्णय क्रमांक -कृषिका१७१०/प्र.क्र. ३०४/३-अे, दिनांक २० जानेवारी,२०११
८)केंद्र शासनाचे पत्र क्रमांक -एफ नं ३६-२८/२००९ एई, एक्सटेंशन डेक्स,दि.१५ फेब्रुवारी,२०११ आणि समक्रमांकित दिनांक ८ मार्च,२०११ चे पत्र
९)कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र.कृ.आ/ एक्स्टे.रिफॉर्मस /विप्र ५/ निधी/२३९/२०१०,दि.१५मार्च,२०११

<u>**प्रस्तावना**</u> :-

कृषि विस्तार कार्यक्रम पुनर्जिवित करुन शेतक-यांच्या गरजेनुरुन तसेच निकडीनुसार कृषि विस्तार कार्यक्रम राबविण्यासाठी " **राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य"** ही केंद्र पुरस्कृत योजना ९० टक्के केंद्र व १० टक्के राज्य हिस्सा या तत्वावर केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार सन २००५-०६ पासून राबविण्यात येत होती. सन २०१०-११ करीता ही योजना जिल्हास्तरावर राबविण्याचे निश्चित झाले आहे. त्या अनुषंगाने प्रस्तावित निधी जिल्हाधिका-यांमार्फत संबंधित जिल्हयांना त्यांच्या आवश्यकतेनुसार उपलब्ध करण्यात येईल. केंद्रीय कृषि मंत्रालयाने राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य या योजनेचा सन २०१०-११ चा कार्यक्रम राबविण्यासाठी संदर्भाधिन दिनांक १४ जून,२०१० च्या पत्रान्वये रु.३१९३.०४ लक्ष (रुपये एकतीस कोटी त्र्याण्णव लक्ष चार हजार फक्त) च्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे.केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून सन २०१०-११ चा कार्यक्रम राबविण्यासाठी संदर्भाधिन क्र.५ अन्वये राज्याची प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

केंद्र शासनाने पहिल्या हप्त्याचा ९० टक्के रु.११३४.८७ लक्ष निधी वितरीत केल्यानुसार शासनाकडून संदर्भाधिन क्र.७ अन्वये रु.११.६०लक्ष (रुपये ११ लाख ६० हजार फक्त) निधी उपलब्ध करण्यात आला आहे.आता केंद्रीय कृषि मंत्रालयाने त्यांच्या संदर्भाधिन क्र.८ अन्वये दुस-या हप्त्याचा ९० टक्के केंद्र हिश्याचा अनुक्रमे २०० लक्ष आणि ९०० लक्ष असा एकूण

११००.०० लक्ष निधी वितरीत केलेला आहे.त्यांच्या मान्यतेच्या अधिन राहून सन २०१०-११ करिता आयुक्तालय स्तरावरील खर्च भागविण्यासाठी अनुदान उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. **"राज्याच्या कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करीता सहाय्य"**या योजनेचा कार्यक्रम राबविण्याकरीता केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.१४ जून,२०१० च्या पत्रान्वये रु.३१९३.०४ लक्ष (रु.एकतीस कोटी त्र्याण्णव लक्ष चार हजार फक्त) चा कार्यक्रम राबविण्यास प्रशासकीय मान्यता दिली आहे. केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधिन राहून सन २०१०-११ करिता मंजूर केलेल्या रु.३१९३.०४ लक्ष (रु. एकतीस कोटी त्र्याण्णव लक्ष चार हजार फक्त) चा कार्यक्रम राबविण्यास राज्य शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त योजनेतील दुस-या हप्त्याचा केंद्र हिश्याचा ९० टक्के निधी रु.११००.०० लक्ष (रु.११ कोटी मात्र) केंद्रीय कृषि मंत्रालयामार्फत त्यांच्या संदर्भाधिन दि.१५ फेब्रुवारी,२०११ च्या पत्रान्वये वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार प्रशिक्षण संस्था,नागपूर या राज्याच्या शिखर प्रशिक्षण संस्थेकडे परस्पर जमा करण्यात आला आहे. सन २०१०-११ करिता प्रस्तुत योजनेचा आयुक्तालय स्तरावरील खर्च भागविण्यासाठी रु.११.२५ लक्ष (रु.अकरा लाख पंचवीस हजार फक्त) इतक्या निधीचा खर्च करण्यास राज्य शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेकरीता मंजूर केलेला निधी आयुक्तालय स्तरावरील मंजूर केलेला निधी खर्च करण्यासाठी **राज्य नोडल अधिकारी तथा संचालक,(विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.**

३. सन २०१०-११ मध्ये सदर योजनेची अंमलबजावणी संदर्भाधिन दिनांक १६ एप्रिल,२०१० व १४ जून,२०१० च्या केंद्र शासनाच्या पत्रात नमूद केलेल्या मार्गदर्शक सूचना,अटी व शर्तीनुसार करण्यात यावी.या योजनेच्या अंमलबजावणीचा आढावा संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी वेळोवेळी घ्यावा तसेच खर्च केलेल्या अनुदानाचा घटकनिहाय तपशील राज्य शासनास विहित मुदतीत पाठविण्याची दक्षता घ्यावी.

४. सन २०१०-११ करीता मंजूर केलेला रु.११.२५ लक्ष (रु.अकरा लाख पंचवीस हजार फक्त ) हा राज्य हिश्याचा निधी खालील लेखाशिर्षाखालील मंजूर व अर्थसंकल्पित तरतुदीतुन भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी- ३**
**२४०१- पीकसंवर्धन**
**१०९- विस्तार व प्रशिक्षण**
**०१ (४३)- कृषि विस्तार कार्यक्रमांना विस्तारविषयक सुधारणा करण्याकरीता सहाय्य**
**(राज्य हिस्सा) (२४०१ ४४३६)**
**३३ - अर्थसहाय्य**

५. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.०३/११/व्यय-१,दिनांक २०/१/२०११ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार प्रधानसचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला आहे.त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०३३११२२१२०४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(वीणा राऊत )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति,**

कुलगुरु, मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी

कुलगुरु, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला
कुलगुरु, महात्मा फुले  कृषि विद्यापीठ,राहुरी,जि.अहमदनगर
कुलगुरु,डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,जि.रत्नागिरी
सचिव,(पदुम),कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव(मृद व जलसंधारण),ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव,ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त,कृषि,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
आयुक्त,सहकार,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य,पुणे
आयुक्त,दुग्धव्यवसाय,वरळी,मुंबई,महाराष्ट्र राज्य
साखर आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
संचालक (विस्तार व प्रशिक्षण),तथा नोडल अधिकारी,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
सर्व संचालक / कृषि सहसंचालक,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
संचालक,पणन,सहकार विभाग,महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,(समाजकल्याण),महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,रेशीम उदयोग,पुणे-मुंबई रस्ता,शासकीय दूध डेअरीसमोर,पुणे ४११००३
संचालक,सामाजिक वनीकरण,महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
सर्व प्राचार्य,विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,पुणे /नागपूर /कोल्हापूर /अमरावती/औरंगाबाद/ नाशिक/खोपोली
सर्व जिल्हयांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता),मुंबई
महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता ),नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
माहिती व जनसंपर्क संचालनालय (५ प्रतीसह)
नियोजन विभाग / वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
मा.मंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
सर्व सहसचिव /उप सचिव (कृषि),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती (का.३ अे)